निलंबित शासकीय सेवकाच्या प्रकरणाचा आढावा घेण्याबाबत विभाग स्तरावर निलंबन आढावा समिती गठित करण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन
## उद्योग, उर्जा व कामगार विभाग
## शासन निर्णय क्रमांकः आयएलई-२०१५/प्र.क्र. ८६ / प्रशासन ३,

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
तारीख: १३ मार्च, २०१५.

वाचा -

१) **सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र : निप्रआ-१११९/प्र.क्र.८६/११ अ, दि.१४.१०.२०११**
२) **सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र : अभियो-१३१२/प्र.क्र.३०/पुर्नबांधित-१, दि.१२.०२.२०१३**
३) **सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र : अभियो-१३१४/प्र.क्र.८६/११ अ, दि.३१.१.२०१५**

## शासन निर्णय-

निलंबित शासकीय सेवकाच्या प्रकरणाचा आढावा घेण्याबाबत सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भाधिन क्र.१ येथील शासन निर्णयान्वये मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखालील समितीऐवजी संबंधित प्रशासकीय विभागाच्या अ.मु.स./प्र.स./सचिव यांच्या अध्यक्षतेखाली त्या त्या प्रशासकीय विभागाच्या अखत्यारीतील राजपत्रित गट अ व गट ब मधील अधिकाऱ्यांचे निलंबन आढावा घेण्याबाबत मंत्रालयीन प्रशासकीय विभागांनी त्यांचे स्तरावर निलंबन आढावा समिती गठित करण्याबाबत सूचना दिलेल्या आहेत.

२. त्यानुषंगाने निलंबित शासकीय सेवकाच्या प्रकरणांचा निपटारा जलदगतीने होण्यासाठी सामान्य प्रशासन विभागाच्या दिनांक १२.२.२०१३ व ३१.१.२०१५ च्या शासन निर्णयास अनुसरुन, या विभागस्तरावर गट अ व ब मधील राजपत्रित अधिकाऱ्यांबाबत पुढीलप्रमाणे प्रधान सचिव (कामगार व प्रशासन) यांच्या अध्यक्षतेखाली पदनिहाय समिती गठित करण्यात येत आहे.

| अ.क्र. | समितीमधील पदाधिकारी | समितीमधील पदनाम |
|---|---|---|
| १. | अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव (उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग (कामगार व प्रशासन)) | अध्यक्ष |
| २. | अतिरिक्त पोलीस महासंचालक लाचलुचपत प्रतिबंधक विभाग | सदस्य |
| ३. | सह सचिव / उप सचिव (गृह विभाग) | सदस्य |
| ४. | सह सचिव / उप सचिव (प्रशासन) (उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग) | सदस्य सचिव |

३. या समितीने सामान्य प्रशासन विभागाच्या दिनांक ३१.१.२०१५ च्या शासन निर्णयातील परिच्छेद क्र. ८ व ९ मधील तरतुदींनुसार कार्यवाही करावी. उपरोक्त सुधारित गठित समितीव्यतिरिक्त दिनांक १४.१०.२०११ व ३१.१.२०१५ मधील अन्य तरतूदी तशाच लागू राहतील.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०३१११३५५५६९६१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digambar Sonusing Rajput

Digitally signed by Digambar Sonusing Rajput
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Industry Energy & Labour Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Digambar Sonusing Rajput
Date: 2015.03.13 02:44:21 -07'00'

**( दि. सो. राजपूत)**
शासनाचे उप सचिव.

प्रत -

१) राज्यपालांचे सचिव
२) मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
३) मा. मंत्री, उद्योग, ऊर्जा व कामगार यांचे स्वीय सहायक
४) मा. मंत्री, ऊर्जा यांचे स्वीय सहायक
५) मा. मंत्री, कामगार यांचे स्वीय सहायक
६) मा. अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
७) प्रधान सचिव (कामगार व प्रशासन) यांचे स्वीय सहायक, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय,मुंबई ३२
८) प्रधान सचिव (उद्योग) यांचे स्वीय सहायक,उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग,मंत्रालय, मुं
९) प्रधान सचिव (ऊर्जा) यांचे स्वीय सहायक,उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग,मंत्रालय, मुंबई
१०) महासंचालक, लाचलुचपत प्रतिबंधक विभाग, वरळी, मुंबई
११) अतिरिक्त पोलिस महासंचालक, लाचलुचपत प्रतिबंधक विभाग, मुंबई
१२) सह सचिव / उप सचिव, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई
१३) उप सचिव (प्रशासन) यांचे स्वीय सहायक,उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग,मंत्रालय,मुंबई
१४) आयुक्त, कामगार आयुक्त कार्यालय, मुंबई
१५) संचालक, औद्योगिक सुरक्षा व संचालनालय, मुंबई
१६) संचालक, बाष्पके संचालनालय, मुंबई
१७) औद्योगिक न्यायालय, मुंबई
१८) कै. नारायण मेघाजी लोखंडे महाराष्ट्र श्रमविज्ञान संस्था, मुंबई
१९) संचालक, उद्योग संचालनालय, मुंबई
२०) संचालक, शासकीय मुद्रण व लेख सामग्री संचालनालय, मुंबई
२१) संचालक, भूविज्ञान व खनिकर्म संचालनालय, नागपूर
२२) निवड नस्ती (प्रशासन ३)